**पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या पीसीएमसी-निगडी मेट्रो रेल्वे कॉरीडॉर प्रकल्पामधील राज्य शासनाच्या हिश्श्याची अनुदानापोटीची रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्याबाबत (सन २०२४-२५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.८६/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२५.

**संदर्भः-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२२/प्र.क्र.१३९/नवि-७, दि. २५ जुलै, २०२४.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. पीआरडी-३३१९/प्र.क्र.०६/नवि-७, दि. १६ मार्च, २०२४.
३. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२४/प्र.क्र.८६/नवि-७, दि.२४/१२/२०२४.

**प्रस्तावना:**

पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या रु.९१०.१८ कोटी प्रकल्प पुर्णत्व किंमतीच्या उन्नत मेट्रो मार्गिकेची महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) या एसपीव्ही संस्थेमार्फत अंमलबजावणी करण्यास नगर विकास विभागाच्या दिनांक १६ मार्च, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यता आली आहे. पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून रु.७९.०८ कोटी इतके अनुदान (Grant) द्यावयाचे आहे. पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता समभाग/अनुदानापोटी सन २०२४-२५ या वर्षात रु.५० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतुदीमधून **रु.२५.०० कोटी** रक्कम पीसीएमसी-निगडी मेट्रो रेल कॉरीडॉर प्रकल्पाकरिता महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस राज्य शासनाच्या हिश्श्याचे अनुदान यासाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या प्रकल्पासाठी राज्य शासनाचे अनुदान म्हणून **सन २०२४-२५** च्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून रक्कम **रु.२५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त)** महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरचे निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-५, ४२१७ नगर विकासावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांमधील गुंतवणूका, राज्य योजना (००) (०६) पुणे मेट्रो

रेल्वे प्रकल्पातील राज्य शासनाचा समभाग, ५४ गुंतवणूक (४२१७०७६६)" या लेखाशिर्षाखाली **सन २०२४-२५** मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम **रू.२५.०० कोटी** रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांच्याकडे वर्ग करावी. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी.

४. महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांनी राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या अनुदानाची **रु.२५.०० कोटी** रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि.कडे जमा झाल्याचे दिनांकासह प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांनी केंद्र शासन/राज्य शासन/पिंपरी चिंचवड महानगरपालिका इ. कडून प्राप्त होणाऱ्या निधीबाबतचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

६. पुणे मेट्रो प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्या वतीने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांनी सदर रक्कम ज्या प्रयोजनाकरिता मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनाकरिता खर्च करावी.

८. सदर लेखाशिर्षाखाली यापूर्वी राज्य शासनाकडून पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ करीता राज्य शासनाचे समभाग म्हणून एकूण रू.१३१० कोटी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. त्याबाबतचा तपशील संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयात नमूद आहे.

९. राज्य शासनाकडून पिंपरी-चिंचवड(पीसीएमसी)-निगडी मेट्रो रेल कॉरीडॉर प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे अनुदान म्हणून एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणेः

| अ.क्र. | दिनांक | रक्कम (रु.कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | २४.१२.२०२४ | २५.०० | राज्य शासन | २५.०० |
| २ | सदरचे वितरण | २५.०० | राज्य शासन | **५०.००** |

१०. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

११. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१०३/व्यय-३, दिनांक १८/०३/२०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२११५१७१५५८२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.21 15:18:31 +05'30'

**(विजय चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. पुणे.
महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, कार्यासन १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव, नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
रोख शाखा (३ प्रती),
निवड नस्ती, नवि-७.